**नवीन लेखाशीर्ष उघडण्याबाबत**

**महाराष्ट्र राज्याचे लॉजिस्टीक धोरण २०२४ अंतर्गत लघु, मोठे, विशाल, अतिविशाल, एकात्मिक ट्रक टर्मिनल्स करीता भांडवली अनुदान तसेच एकल घटकांना व्याज दर अनुदान व तंत्रज्ञान सहाय्यासाठी द्यावयाच्या प्रोत्साहनांकरिता नवीन लेखाशिर्ष उघडण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग ,ऊर्जा ,कामगार व खनिकर्म विभाग**

**शासन निर्णय क्र. मऔधो २०२४/प्र.क्र १९७/उद्योग-२**

मादाम कामा मार्ग ,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई ४०००३२.
दिनांक : ०५ जून, २०२५

**वाचा :** शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, क्र. मऔधो-२०२३/प्र.क्र.२२३/उद्योग-२, दि.२६ ऑगस्ट, २०२४.

**शासन निर्णय -:**

शासन निर्णय, दि.२६.०८.२०२४अन्वये महाराष्ट्र राज्याचे लॉजिस्टीक धोरण २०२४ जाहीर करण्यात आले आहे. महाराष्ट्र राज्याचे लॉजिस्टीक धोरण २०२४ अंतर्गत लॉजिस्टीक नोडस तसेच लॉजिस्टीक हबच्या पायाभूत सुविधा प्रकल्प राबविण्याकरिता रु. ७,००० कोटी, लघु, मोठे, विशाल, अतिविशाल, एकात्मिक ट्रक टर्मिनल्स करीता भांडवली अनुदानासाठी रु. ६३५ कोटी तसेच एकल घटकांना व्याज दर अनुदान व तंत्रज्ञान सहाय्यासाठी द्यावयाच्या प्रोत्साहनांकरिता रु. ६७५ कोटी या बाबी अंतर्गत दोन स्वतंत्र लेखाशिर्ष निर्माण करुन प्रस्तुत धोरणाच्या अंमलबजावणीसाठी धोरण कालावधीत एकूण रु. ८३१० कोटी एवढी तरतूद करण्यात आली आहे. तद्अनुषंगाने, सदर तरतूद उपलब्ध करुन देण्याकरीता दोन नवीन लेखाशिर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

महाराष्ट्राचे लॉजिस्टीक धोरण-२०२४ अंतर्गत लघु,मोठे,विशाल, अतिविशाल व एकात्मिक ट्रक टर्मिनल्स करीता भांडवली अनुदान व एकल घटकांना व्याज दर अनुदान व तंत्रज्ञान सहाय्यासाठी द्यावयाची प्रोत्साहनांकरीता नवीन लेखाशिर्ष उघडण्यास शासन याद्वारे मंजूरी देत आहे.

| **महाराष्ट्राचे लॉजिस्टीक धोरण २०२४-अंतर्गत लघु,मोठे,विशाल, अतिविशाल व एकात्मिक ट्रक टर्मिनल्स करीता भांडवली अनुदान व एकल घटकांना व्याज दर अनुदान व तंत्रज्ञान सहाय्यासाठी द्यावयाची प्रोत्साहने** | | |
|---|---|---|
| | **मराठी** | **English** |
| मागणी क्र. | के-७ | K-7 |
| मुख्य लेखाशीर्ष | २८५२,उद्योग | 2852,Industries |
| उप मुख्यलेखाशीर्ष | ८०-सर्वसाधारण | 80- General |
| गौणशीर्ष | १०४-औद्योगिक प्रोत्साहन | 104- Industrial Promotion |
| गटशीर्ष | (०३) महाराष्ट्र लॉजिस्टीक धोरण | (03) Maharashtra Logistic Policy |
| उपगटशीर्ष | (०३)( ०१) लघु,मोठे,विशाल, अतिविशाल व एकात्मिक ट्रक टर्मिनल्स करीता भांडवली अनुदान व एकल घटकांना व्याज दर अनुदान व तंत्रज्ञान सहाय्यासाठी प्रोत्साहने (कार्यक्रम) (२८५२A१०२) | (03) (01 ) Capital subsidy to Small, Large, Mega, Ultra Mega and Integrated Truck Terminals and interest rate subsidy to Single Entities and incentive for Technology Assistance (Scheme) (2852A102) |
| उद्दिष्ट | ३५,भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान | 35,Grant in aid for Creation of Capital Assets |

**३.** सदर शासन निर्णय प्रधान महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता, मुंबई यांच्या No KV/CHA-I/IE&LD/UOR - 06/2025-26/123 दिनांक ०५/०५/२०२५ रोजीच्या टिप्पणीन्वये दिलेल्या मान्यतेने तसेच वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.४०/व्यय-१६, दि.०५/०६/२०२५ अन्वये सल्लामसलत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०६०५१६२२०२३६१० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNITA AJAY HAZARI

Digitally signed by SUNITA AJAY HAZARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=902bffd437652eee8f65932190c71d2b5cd1778714d082db09d1994383cce843, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E3B30CC02C8FF1BDF9FCDCD3B2536AF5C8ADFD05E9D409FAE0A032DDB4385717, cn=SUNITA AJAY HAZARI
Date: 2025.06.05 16:23:27 +05'30'

**(सुनिता हजारी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विकास आयुक्त (उद्योग),उद्योग संचालनालय,मुंबई.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी ,महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ ,मुंबई.
३. महालेखापाल-१/२, लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा, (मुंबई/नागपूर)
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. विक्रीकर आयुक्त, विक्रिकर भवन, मुंबई.
७. वित्त विभाग (अर्थ-१४/व्यय-१६), मंत्रालय,मुंबई.
८. कार्यासन अधिकारी (प्रशासन-१),उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग,मंत्रालय,मुंबई.
९. निवडनस्ती, संग्रहार्थ.